परिविक्षाधीन उपमुख्य कार्यकारी अधिकारी/गट विकास अधिकारी गट-अ आणि परि विक्षाधीन सहाय्यक गट विकास अधिकारी गट-ब यांना जिल्हा स्तरावरील प्रशिक्षणाकरिता जिल्हा वाटप करण्याबाबत- सीपीटीपी-४/अ.

**महाराष्ट्र शासन**
**ग्रामविकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मविसे १०/२०१९/प्र.क्र.३/आस्था-३(अ)**
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, मुंबई ४००००१
तारीख :- १५ जानेवारी २०१९

**वाचा -**

१) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ दिनांक २०.१.२०१४
२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग. क्र.टिआरएन-१११४/ प्र.क्र.८३/ १८-ब दिनांक ३.११.२०१४
३) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-७१५/प्र.क्र.८३/१८-ब दिनांक १३.७.२०१५
४) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग. क्र.टिआरएन-०६१८/प्र.क्र.३३ (भाग-२)/सीपीटीपी दिनांक १.१.२०१९

**प्रस्तावना -**

उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षेमधून सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-ब मधील अधिकाऱ्यांना एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण देण्याबाबतचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार राज्यसेवा मुख्य परीक्षा-२०१६ मधून शिफारस प्राप्त झालेल्या परंतू गत वर्षी प्रशिक्षणास रुजू होण्यास मुदतवाढ देण्यांत आलेल्या महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील परिवीक्षाधीन सहाय्यक गट विकास अधिकारी गट-ब यांचे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण वनामती येथे दिनांक १६.१.२०१९ पासुन सुरु होणार आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार सदर प्रशिक्षणार्थींना विभागामार्फत ७९ आठवडयांचे प्रशिक्षण जिल्हास्तरावर दयावयाचे

आहे. संदर्भ क्र.२ अन्वये सदर ७९ आठवडयांच्या प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटपाबाबत मार्गदर्शक सूचना सामान्य प्रशासन विभागाने निर्गमित केल्या आहेत . संदर्भाधीन क्र.३ येथील शासन परिपत्रकानुसार प्रशिक्षणार्थींना जिल्हास्तरावरील ७९ आठवडयांपैकी १/३ कालावधी संलग्न प्रशिक्षण व १/३ कालावधी लगतपूर्व पदाचा स्वतंत्र कार्यभार याप्रमाणे प्रशिक्षणाकरिता पदस्थापना देण्याचे विभागाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय-**

सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र .२ च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील परिवीक्षाधीन अधिका-यांना विभागामार्फत प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटप करण्यांत येत आहे. दोन्ही संवर्गासाठी सदर प्रशिक्षणाबाबतची कार्यक्रम पुस्तिका राज्य ग्रामीण विकास संस्था , यशदा, पुणे मार्फत तयार करण्यात आली आहे. सदर कार्यक्रम पुस्तिकेनुसार ७९ आठवडयांपैकी १/३ कालावधी संलग्न प्रशिक्षण व १/३ कालावधी लगतपूर्व पदाचा स्वतंत्र कार्यभार असून उर्वरित आठवड्यांचा स्वतंत्र कार्यभार सदर प्रशिक्षणार्थींना देण्यात येणार आहे . त्यानुसार महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब संवर्गातील परिवीक्षाधीन सहाय्यक गट विकास अधिकारी गट ब मधील ५ परिवीक्षाधीन अधिकाऱ्याला परिशिष्ट-अ येथे त्यांच्या नांवासमोर नमूद केलेल्या जिल्हा परिषदेमध्ये प्रशिक्षणाकरिता पदस्थापना देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील परिवीक्षाधीन प्रशिक्षणार्थींची वनामती,नागपूर येथे तसेच सदर प्रशिक्षणा दरम्यान घेण्यात येणाऱ्या चाचणी परिक्षांबाबत यशदामधील समन्वय अधिकाऱ्यांनी सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद यांचेशी समन्वय ठेवून कार्यक्रम पुस्तिकेतील वेळापत्रकाप्रमाणे चाचणी परीक्षा घ्याव्यात.

३. उपरोक्त अधिकाऱ्यांकरीता अधिसंख्य पदे दिनांक १५.१.२०१९ च्या आदेशान्वये निर्माण करण्यांत आली आहेत. या उमेदवारांच्या वेतन प्रदानाकरिता त्यांची सेवार्थ प्रणालीमध्ये नोंदणी व डिसीपीएस क्रमांक मिळविणे, तसेच वेतनाबाबत कार्यवाहीसाठी आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त करण्याची कार्यवाही संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११५१४४८४०४१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Natha Savane

Digitally signed by Rajendra Natha Savane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec0392 5f2eb8727640eacf311beb6f68d63939303, serialNumber=f049989dbbef93340e9edd88 af960a0963746d42baa5c948405b62e82152 9a99, cn=Rajendra Natha Savane
Date: 2019.01.15 18:05:09 +05'30'

**(रा.ना.सवने)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. मा.प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व विभागीय आयुक्त.
४. महासंचालक, यशदा , पुणे
५. संचालक, वनामती, नागपूर
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक,अमरावती,औरंगाबाद,सांगली
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक,अमरावती,औरंगाबाद,सांगली
८. सर्व कोषागार अधिकारी नाशिक,अमरावती,औरंगाबाद,सांगली
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
१०.महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर
११.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१२.अर्थसंकल्प-३, १६ व व्यय-१५, वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
१३.कार्यासन-वित्त-१, आस्था-३, वित्त-९ ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती, आस्था-३(अ)

**परिशिष्ट "अ"**

ग्राम विकास विभाग, शासन निर्णय,क्र.मविसे १०/२०१९/प्र.क्र.४/आस्था-३(अ),
दि. .१५.१.२०१९ चे सहपत्र.

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम, CPTP-४(अ) अंतर्गत वनामती, नागपूर येथे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षणाकरिता रुजू झालेल्या सहाय्यक गट विकास अधिकारी, गट-ब पदावरील ५ अधिकाऱ्यांना ७९ आठवडयांचे "जिल्हास्तर व स्वतंत्र कार्यभार" या प्रशिक्षणासाठी पुढीलप्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या जिल्हा परिषदेमध्ये पदस्थापना देण्यांत येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | स्व महसुली विभाग | स्व- जिल्हा | प्रशिक्षणासाठी देण्यांत आलेला जिल्हा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.होळकर उध्दव शेकू | औरंगाबाद | औरंगाबाद | जिल्हा परिषद, नाशिक |
| २ | श्री.कल्हारे गोपाळ उत्तमराव | औरंगाबाद | परभणी | जिल्हा परिषद, नाशिक |
| ३ | श्री.सोनवणे तुषार राजाराम | नाशिक | नाशिक | जिल्हा परिषद, औरंगाबाद |
| ४ | श्री.मेश्राम स्वप्नील भिमराव | नागपूर | नागपूर | जिल्हा परिषद, अमरावती |
| ५ | श्रीम.पाटील प्रिया बाळासाहेब | पुणे | कोल्हापूर | जिल्हा परिषद, सांगली |

---------